बदली रद्द करणेबाबत...

**सहायक प्राध्यापक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये**

**महाराष्ट्र शासन,**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०२४/(प्र.क्र.८२/२४)/तांशि-१**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १० फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ:** शासनाचे समक्रमांक दिनांक १४ ऑक्टोबर, २०२४ रोजीचे आदेश

**शासन आदेश :**

"महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५" मधील कलम ४(४) दोन व पाच मधील तरतुदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने संदर्भीय बदली आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सदर आदेशानुसार श्री. ज्ञानेश्वर गायकवाड यांना शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगाव या संस्थेतून दिनांक १४.१०.२०२४ (म.नं.) कार्यमुक्त केले होते. तथापि, श्री. गायकवाड दिनांक १५.१०.२०२४ रोजी शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर येथे रूजू होण्याकरिता गेले असता, सदर संस्थेमध्ये त्यांना रूजू होण्याकरिता पद उपलब्ध नसल्याने त्यांना रूजू करून घेण्यात आलेले नाही. सबब, संदर्भीय आदेशान्वये निम्नलिखित अध्यापकांची करण्यात आलेली बदली सदर आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे-

| अध्यापकांचे नाव व पूर्वी कार्यरत संस्था | दिनांक १४.१०.२०२४ रोजीच्या आदेशानुसार बदलीचे ठिकाण | बदली रद्द करण्याचे कारण |
|---|---|---|
| श्री. ज्ञानेश्वर मारोतराव गायकवाड, सहायक प्राध्यापक, अणुविद्युत, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगाव | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर | बदली करण्यात आलेल्या संस्थेत पद रिक्त नसल्याने |

२. श्री. ज्ञानेश्वर गायकवाड, सहायक प्राध्यापक, अणुविद्युत यांनी शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगाव येथे तात्काळ रूजू व्हावे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१०१८१०४५१८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PAGARE SHRIKRISHNA KASHINATH

Digitally signed by PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=cc78d6dbb4fe0c3d5473ed374dc1007ae7db08a8a6ca9468ce2a8aae16c0cb06, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4E8BC157609C105D396B04018FA47F8909333AFC18DDC3893CC043F18F759C0B, cn=PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
Date: 2025.02.10 18:12:01 +05'30'

**(श्रीकृष्ण पगारे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
५) प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगाव / छत्रपती संभाजीनगर (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षक) मुंबई / नागपूर, महाराष्ट्र १/२.
७) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव / छत्रपती संभाजीनगर (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
९) श्री. ज्ञानेश्वर मारोतराव गायकवाड, सहायक प्राध्यापक, अणुविद्युत, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगाव
१०) निवड नस्ती - तांशि -१.